राज्यस्तरीय तलाव ठेका समितीची पुनर्रचना करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि ,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक-मत्स्यवि १२०१/१५७२७/सीआर-१२५/पदुम-१३.
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : १३ सप्टेंबर २००१

वाचा :- १) शासन निर्णय, कृषि ,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्रमांक-मत्स्यवि १२६१/सीआर-१३५/पदुम-१३, दि.२९.६.१९९५.
२) आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई यांची क्रमांक- मत्स्य(भू) ०११२०१/५६-२००१, दिनांक ९.५.२००१ व १५.५.२००१ ची पत्रे.

प्रस्तावना :- मत्स्यव्यवसाय विभागाअंतर्गत असलेले तलाव ठेक्याने देण्यासाठी, कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाच्या दि.२९.६.१९९५ च्या शासन निर्णयानुसार स्थापन केलेल्या, राज्यस्तरीय तलाव ठेका समितीची पुनर्रचना करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. आता शासनाने राज्यस्तरीय तलाव ठेका समितीची पुनर्रचना करण्याबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

शासन निर्णय :-

राज्यस्तरीय तलाव ठेका समितीची पुनर्रचना खालील प्रमाणे करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त (मत्स्यव्यवसाय) | अध्यक्ष |
| २ | उप सचिव (मत्स्यव्यवसाय) | सदस्य |
| ३ | उप सचिव (पाटबंधारे) | सदस्य |
| ४ | उप सचिव (वित्त विभाग) | सदस्य |
| ५ | संबंधीत प्रादेशिक मत्स्यव्यवसाय उपसंचालक, मुंबई/पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती / नागपूर | सदस्य |
| ६ | संबंधित जिल्हा मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी | सदस्य |
| ७ | मत्स्यव्यवसाय उपसंचालक (भूजल) | सदस्य सचिव |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( वि. शं. धोंगडे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग.